**शासकीय हेलिकॉप्टर एएस ३६५ एन.३ डॉफिन व्हीटी-एमजीके च्या परिरक्षण कंत्राटाबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-एव्हीएन.१००६/प्र.क्र.१२५/०६/२८अ
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांकः- १९ जानेवारी, २०१०

वाचा- (१)शासन ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग समक्रमांक दिनांक ५ जून २००७ आणि २७ फेब्रुवारी २००९
(२)संचालक, विमान चालन संचालनालय यांचे पत्र क्र.डीए/एडीएम/१२७७/०९ दिनांक ८ ऑक्टोबर २००९

**प्रास्ताविक-**

संदर्भाधीन शासन ज्ञापन दिनांक ५ जानेवारी २००७ नुसार शासकीय हेलिकॉफ्टर एएस ३६५ एन.३ डॉफिन व्हीटी-एमजीके चे परिरक्षण आणि कार्यान्वयाचे कंत्राट मे.एअर वर्क्स इंडिया इंजिनिअरिंग प्रायव्हेट लि.मुंबई यांना दिनांक १ ऑगस्ट २००६ ते ३१ जुलै २००९ या कालावधीसाठी देण्याकरिता मान्यता देण्यांत आली आहे. त्यानुसार सदर कंत्राटाचा कालावधी दिनांक ३१ जुलै २००९ रोजी समाप्त झाला आहे.

१.१ मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १० जुलै २००९ रोजी आयोजित केलेल्या विमान चालन क्षेत्राशी संबंधित शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीमध्ये शासकीय हेलिकॉफ्टरच्या परिरक्षणाच्या संदर्भात असा निर्णय घेण्यांत आला आहे की, मे.एअर वर्क्स इंडिया इंजिनिअरिंग प्रायव्हेट लि.मुंबई त्यांच्या सध्याच्या दराने शासकीय हेलिकॉफ्टरच्या परिरक्षणाचे काम करण्यास तयार असतील तर, त्यांचे समवेत दिनांक १ ऑगस्ट २००९ पासून १ वर्ष किंवा १० वर्षांच्या तपासणीसाठी हेलिकॉफ्टर प्रत्यक्षात भूमिस्थ ठेवण्याच्या कालावधीपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत हेलिकॉफ्टरच्या परिरक्षणाच्या संदर्भात संचालनालयामार्फत विहीत करार करण्यात यावा.

१.२ याप्रकरणी संचालक, विमान चालन संचालनालय यांनी संदर्भाधीन दिनांक ८ ऑक्टोबर २००९ च्या पत्रान्वये असे कळविले आहे की, मे.एअर वर्क्स इंडिया इंजिनिअरिंग प्रायव्हेट लि.मुंबई विद्यमान दराने हेलिकॉफ्टरची देखभाल व परिरक्षण करण्यास इच्छुक आहे. त्यामुळे मे.एअर वर्क्स इंडिया इंजिनिअरिंग प्रायव्हेट लि.मुंबई यांच्या समवेत हेलिकॉफ्टरच्या परिरक्षणाचा करार करण्यासाठी शासनाची मान्यता द्यावी.

**शासन निर्णय-**

२. शासकीय हेलिकॉफ्टर एएस ३६५ एन.३ डॉफिन व्हीटी-एमजीके च्या देखभाल आणि परिरक्षणासाठी मे.एअर वर्क्स इंडिया इंजिनिअरिंग प्रायव्हेट लि.मुंबई यांच्या समवेत सध्याच्या दराने (द.म.रु.३.६० लक्ष + अनुज्ञेय कर) करार करण्यासाठी आणि शासकीय हेलिकॉफ्टरच्या परिरक्षणाचे काम सदर कंपनीकडे दिनांक १ ऑगस्ट २००९ पासून १ वर्ष किंवा १० वर्षाच्या तपासणीसाठी हेलिकॉफ्टर प्रत्यक्षात भूमिस्थ ठेवण्याच्या

कालावधीपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत हेलिकॉफ्टरच्या परिरक्षणाच्या संदर्भात विहीत करार करण्यासाठी शासन मान्यता देत आहे. तसेच सदर कंपनीसमवेत विहीत करार करण्यासाठी संचालक, विमान चालन संचालनालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. विमान चालन संचालनालयाने विहीत करार करुन, सदर कराराची प्रत शासनास सादर करावी.

३. याप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च खालील लेखाशीर्षाखाली चालू आर्थिक वर्षी मंजूर असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीतून भागविण्यांत यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

मागणी क्रमांक ए-४
२०७०- इतर प्रशासनिक सेवा
(००)(०२) विमानचालन सल्लागार
महाराष्ट्र शासन २७
लहान बांधकामे(२०७० ०१५६)

४. हा शासन निर्णय विमान चालन क्षेत्रविषयक शक्तीप्रदत्त समितीच्या दिनांक १० जुलै २००९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०१००१२७१८३८३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

सही/-

(अं.वि.अंभिरे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,
१. संचालक, विमान चालन संचालनालय, जुहू विमानतळ, हॅंगर क्र.६, मुंबई४०००५४
२. संचालक, मे.एअर वर्क्स इंडिया इंजिनिअरिंग प्रायव्हेट लि.मुंबई, जुने विमानतळ, कलिना मिलीटरी कॅम्पजवळ, साताक्रुझ(पूर्व), मुंबई४०००२९
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग/व्यय-४, मंत्रालय, मुंबई
९. उपसचिव(विमान चालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती.